**कारागृहातील मातांची व त्यांच्या मुलांची भेट घडवून आणण्यासाठी परिविक्षा अधिका-यांनी करावयाची कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अपअ-२०१६ / प्र. क्र. ८६ / का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०७ सप्टेंबर, २०१७

**संदर्भ-** शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२००४/ प्र. क्र. ५३/ का-३, दिनांक- ३१ जानेवारी, २००५.

**परिपत्रक-**

संदर्भीय शासन परिपत्रकान्वये कारागृहात दाखल झालेल्या महिला बंदींपासून विभक्त झालेल्या मुलांची व मातांची भेट घडवून आणण्यासंदर्भात सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत. जनहित याचिका क्र. १०७ / २०१४ च्या संदर्भात प्रयास या संस्थेचे ॲमिकस क्युरी श्री. राघवन यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांना यासंदर्भात सादर केलेल्या सूचनेच्या अनुषंगाने आता या परिपत्रकान्वये संदर्भीय शासन परिपत्रकात सुधारणा करुन पुढील प्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

१. कारागृहात दाखल झालेली महिला ही कोणत्याही जिल्हयातील असू शकते. त्यामुळे परिविक्षा अधिकारी, जो कारागृहाचा संपर्क अधिकारी असेल, त्या महिलेच्या मुलास तिच्या भेटीस आणण्यासाठी कारागृहाच्या अधीक्षकामार्फत भेटीची तारीख व वेळ घेईल आणि त्या महिलेच्या बालकाचे वास्तव्य असलेल्या जिल्हयातील परिविक्षा अधिका-यांस कळवेल. संबंधीत जिल्हा परिविक्षा अधिकारी त्या महिलेच्या बालकांच्या वास्तव्याच्या ठिकाणी संपर्क साधेल आणि महिलेच्या नातेवाईकांस भेटीची तारीख व वेळ निदर्शनास आणून देऊन मुलांची त्यांच्या मातेशी भेट घडवून आणणे आवश्यक असल्याचे कळवेल.

२. जर कारागृहात दाखल झालेल्या महिलेचे मूल महिला व बाल विकास विभागाच्या अंतर्गत कार्यरत असलेल्या शासकीय किंवा अशासकीय निवासी संस्थेत (बालगृह इ.) असेल तर परिविक्षा अधिकारी, जो कारागृहाचा संपर्क अधिकारी असेल, त्या निवासी संस्थेतील परिविक्षा अधिका-याशी

संपर्क साधेल आणि मुलाला त्याच्या मातेशी भेट घडवून आणण्याची विनंती करेल. संस्थेतील मुलास त्याच्या मातेच्या भेटीस नेण्याची व आणण्याची जबाबदारी त्या संस्थेची राहील.

३. मुलाची व त्याच्या मातेची भेट किमान पंधरा दिवसातून एक वेळा व्हावी. या व्यतिरिक्त आपत्कालीन परिस्थितीमध्ये देखील भेट घडवून आणण्यात यावी.

४. कारागृह अधीक्षक किंवा कारागृहात कार्य करणारी या विषयासंदर्भातील संलग्न स्वयंसेवी संस्था यांनी महिला बंदी व या विभागाच्या संस्थेत दाखल असलेल्या मुलांची भेट घडवून आणणे बाबत जिल्हा परिविक्षा अधिकारी यांना कळविल्यास त्यांनी महिला बंदी व त्यांच्या मुलांची भेट घडवून आणण्याची कार्यवाही तात्काळ करावी.

हे परिपत्रक गृह विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१/तु-२, दि.२३.०८.२०१७ च्या टिप्पणीन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०१७०९०८१२२१४६८४३० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.09.08 12:12:11 +05'30'

**( स्मिता निवतकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री / राज्यमंत्री (महिला व बाल विकास), मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१०) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
१३) सर्व कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य. (आयुक्तालयामार्फत)
१४) सर्व अधिक्षक, मध्यवर्ती कारागृह / जिल्हा कारागृह, महाराष्ट्र राज्य. (आयुक्तालयामार्फत)
१५) सर्व विभागीय उप आयुक्त (महिला व बाल विकास) (आयुक्तालयामार्फत)
१६) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
१७) सर्व अधिक्षक, बालकांच्या निवासी संस्था (आयुक्तालयामार्फत),
१८) निवडनस्ती (का-९).